महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत कृषि महाविद्यालय, नंदुरबार या महाविद्यालयास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुदान वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७२३/प्र.क्र.८४/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ मार्च, २०२४.

**संदर्भ :** १) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ व दि.०५.०२.२०२४.
२) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र.मफुकृवि/लेखा-२/९८८/२०२४, दि.२५.०१.२०२४.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक-बीयुडी-२०२३/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि.२१.०२.२०२४.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषि विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान या योजनेंतर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता रु.४००.०० लाख व ३६, सहायक अनुदाने (वेतन) करीता रू.१५०.०० लाख असा एकूण रू.५५०.०० लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्यासअनुसरुन, संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये नंदुरबार कृषि महाविद्यालयाकरीता २४०१ ८२९१ या लेखाशिर्षातंर्गत ३६, सहायक अनुदाने (वेतन) या बाबीकरीता निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता दिलेली आहे. सदर मान्यतेस अनुसरुन सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदीतून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता " मागणी क्र. टी-५, मुख्य लेखाशिर्ष २४०१, पीक संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१ ) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०३) कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४०१ ८२९१) या योजनेंतर्गत ३६, सहायक अनुदाने (वेतन) या बाबीकरीता निधी खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पीत तरतूद** | **या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ |
| कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत नंदुरबार येथील कृषि महाविद्यालय. ०१, पिकसंवर्धन | (२४०१ ८२९१) | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | ५००.०० | १५०.०० |
| | | **एकूण** | **५००.००** | **१५०.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१. वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.
२. वरील मंजूर अनुदानाचा प्रत्यक्ष खर्च, मंजूर पदसंख्या व वितरीत अनुदानाचा विनियोग कृषि विद्यापीठाने प्रत्येक महिन्याच्या अखेरीस शासनास सादर करावा. कृषि विद्यापीठाने उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनांतर्गत योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी / कारणांमुळे एखाद्या योजनेखाली अनुदान अखर्चित राहिल्यास सदर अनुदान पुढील महिन्यामध्ये वितरीत करण्यात येणाऱ्या अनुदानामध्ये समायोजित करावे. तथापि, सन २०२३-२४ मध्ये उपलब्ध झालेले अनुदान मंजूर मासिक वितरण विवरणपत्रानुसार खर्च करणे अनिवार्य राहील.
३. उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.
४. प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट / योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.
५. सन २०२३-२४ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.
६. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

७. उप विभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर यांनी वरीलप्रमाणे " मागणी क्र. टी-५, २४०१- पीक संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०३) कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (कार्यक्रम), (२४०१ ८२९१) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) व ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या उपशीर्षांतर्गत वितरीत करण्यात आलेले उपरोक्त अनुदान नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

८. याप्रित्यर्थचा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात खालील लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| **लेखाशिर्ष** | **मंजूर अनुदान** |
|---|---|
| मागणी क्र. टी-५, २४०१- पीक संवर्धन,<br>पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१)जनजाती क्षेत्र उपयोजना ,<br>(०१)(०३) कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (कार्यक्रम), २४०१ ८२९१<br>३६,सहायक अनुदाने (वेतन) | रु.१,५०,००,००० |

३. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार व वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ व दि.०५.०२.२०२४ च्या परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन तसेच, आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि.२१.०२.२०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३०४११५४५४०३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2024.03.04 12:04:11 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.मंत्री, कृषि व पदुम विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
७. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.

८. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
९. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर.
१०.महालेखापाल, (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) /महाराष्ट्र १/२,मुंबई / नागपूर.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, जिल्हा अहमदनगर.
१२.उपकोषागार अधिकारी, राहुरी, जिल्हा अहमदनगर.
१३.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१४.उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१५.जिल्हा लेखा परिक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
१६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७.निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१८.उपसचिव, आदिवासी विकास विभाग(कार्या-२,कार्या-६,कार्या-९) मंत्रालय, मुंबई.
१९.वित्त विभाग (व्यय १ / अर्थसंकल्प - १३ / अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
२०.कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक - २अे / ६अे /, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.